**पोलीस आयुक्त, पिंपरी चिंचवड यांच्या आस्थापनेवर "सहायक पोलीस आयुक्त" श्रेणीतील ०४ पदे निर्माण करण्यास मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः अेपीओ-०८२१/प्र.क्र.१४/पोल-३**

मंत्रालय, दुसरा मजला, मुख्य इमारत
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई
दिनांक : ०४ ऑगस्ट, २०२३.

वाचा :-

१) गृह विभाग,शासन निर्णय क्र.अेपीओ-०८१६/प्र.क्र.१०३/पोल-३,दि.२८/०५/२०१८.
२) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र.पोमसं/२६-अ/४७/सपोआ ४ पदे/पिं-चिं/१६४/२०१९, दि.०६/१०/२०२१ .
३) उच्च स्तरीय सचिव समितीच्या दि.१३/०७/२०२३ रोजी पार पडलेल्या सन २०२३ मधील बैठकीचे इतिवृत्त.

प्रस्तावना :-

गृह विभाग, शासन निर्णय दि.२८/०५/२०१८ अन्वये पोलीस आयुक्त, पुणे शहर आणि पोलीस अधीक्षक, पुणे ग्रामीण कार्यक्षेत्राचे विभाजन करुन पिंपरी-चिंचवड पोलीस आयुक्तालय निर्माण करण्यात आले आहे. या शासन निर्णयाव्दारे पोलीस आयुक्त, पिंपरी चिंचवड साठी अपर पोलीस आयुक्ताचे १ पद, पोलीस उप आयुक्तांची ३ पदे व सहायक पोलीस आयुक्तांची ८ पदे निर्माण करण्यास मान्यता देण्यात आली आहे.

२. पिंपरी चिंचवड पोलीस आयुक्तालय हद्दीची लोकसंख्या १५ लाखापेक्षा जास्त आहे. तसेच औद्योगिक क्षेत्र, एमआयडीसी, वाढती लोकसंख्या, आयटी कंपन्या, शासकीय कार्यालये, वाहनांची वाढती संख्या, तसेच गुन्ह्यांत होणारी वाढ लक्षात घेऊन कायदा व सुव्यवस्था अबाधित राखण्यासाठी सहायक पोलीस आयुक्त दर्जाच्या अधिकाऱ्यांची अतिरिक्त एकूण ४ पदे निर्माण करणेबाबतची शिफारस पोलीस महासंचालक कार्यालयाने संदर्भाधीन क्र.२ च्या पत्राव्दारे शासनास केली आहे.

३. त्यानुषंगाने उक्त संदर्भ क्र.३ येथील दि.१३/०७/२०२३ रोजी मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे अध्यक्षतेखाली पार पडलेल्या उच्च स्तरीय सचिव समितीच्या बैठकीच्या इतिवृत्तानुसार समितीने दिलेली मान्यता विचारात घेऊन, शासनाने याप्रकरणी पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

शासन निर्णयः-

पोलीस आयुक्त, पिंपरी-चिंचवड यांच्या आस्थापनेवर "सहायक पोलीस आयुक्त" या दर्जाची एकूण ०४ पदे निर्माण करण्यास मान्यता देण्यात येत आहे. या सहायक पोलीस आयुक्त या पदांची वेतनश्रेणी एस-२०: ५६१००-१७७५०० अशी आहे.

२. उपरोक्त नमूद एकूण ०४ पदासांठी येणारा रू.६०,९७,३९२ /-(अक्षरी रु. साठ लाख सत्त्याण्णव हजार तीनशे ब्याण्णव फक्त/-) इतका वार्षिक आवर्ती खर्च व रु.३५,७६,०००/- (अक्षरी रु.पस्तीस लाख शहात्तर हजार फक्त/-) एवढा अनावर्ती खर्च मंजूर अनुदानातून भागविण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३. हा शासन निर्णय मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली दि.१३/०७/२०२३ रोजी झालेल्या उच्च स्तरीय सचिव समितीने दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०८०४१७१२५५१७२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

KAILAS ARJUN GAIKWAD

Digitally signed by KAILAS ARJUN GAIKWAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=b31abfcb1894c4c597cc944f19a89f474e7b98a708cc03eb46cd241a604d42bb, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=47D160717AE29C2D2661B5275D8B9B4CFAE93893BE65A27853145A4C04D865CD, cn=KAILAS ARJUN GAIKWAD
Date: 2023.08.04 17:14:39 +05'30'

**( कैलास गायकवाड )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा.उपमुख्यमंत्री (गृह) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. अपर मुख्य सचिव (गृह), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. अपर मुख्य सचिव (सेवा), साप्रवि, मंत्रालय, मुंबई.
५. अपर मुख्य सचिव (वित्त),वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
६. प्रधान सचिव (विशेष), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
८. पोलीस आयुक्त, पिंपरी चिंचवड आयुक्तालय, पुणे.
९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१०. निवासी लेखा परीक्षा अधिकारी,मुंबई.
११. सह सचिव(पोल ३),गृह विभाग,मंत्रालय,मुंबई.
१२. वित्त विभाग (व्यय-७)/वित्तिय सुधारणा-१/आ.पु.क.
१३. निवड नस्ती, पोल-३.